**महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांना महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांना ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) अंतर्गत कृषि महाविद्यालय, कराड व कृषि महाविद्यालय, हाळगांव या दोन कृषि महाविद्यालयाच्या इमारत बांधकासाठी सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात पुरवणी मागणीव्दारे मंजूर करण्यात आलेले अनुदान वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : मफुवि -१४१६/प्र. क्र. ७०/८-अे,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक : ०४ मार्च, २०१७.**

वाचा :- १) नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांचे पत्र क्रमांक जा.क्र.मफुकृवि/बांध/९३०६/ २०१६, दिनांक २९/१०/२०१६,
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-पूरक -२०१६/प्र.क्र.२०१/अर्थ-३, दिनांक ०४ जानेवारी, २०१६,
३) शासन पत्र क्रमांक, कृषि व पदुम विभाग क्र. संकिर्ण - २०१७/प्र.क्र.०७/१७/२-अे, दिनांक १० जानेवारी, २०१७,
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-संकिर्ण -२०१७/प्र.क्र.०७/कोषा-प्र-५, दिनांक १७ जानेवारी, २०१७.
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-अर्थसं -२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक ०८ फेब्रुवारी, २०१७.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र विधानमंडळाच्या डिसेंबर, २०१६ च्या हिवाळी अधिवेशनात मंजूर झालेल्या पुरवणी विनियोजन विधेयकास मा.राज्यपालांनी संमती दिली असून ते महाराष्ट्र (तृतीय पुरवणी) विनियोजन अधिनियम, २०१६ (सन २०१६ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक - १) म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण, भाग-४, दिनांक ०२ जानेवारी, २०१७ यामध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे. सदर अधिनियमान्वये सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात कृषि महाविद्यालय कराड, जिल्हा - सातारा व पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर कृषि महाविद्यालय, हाळगांव, ता.जामनेर, जि.अहमदनगर **या दोन कृषि महाविद्यालयांच्या इमारत बांधकामासाठी** महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांना " मागणी क्रमांक डी-३, २४१५ कृषि विषयक संशोधन व शिक्षण" या मुख्य लेखाशीर्षाखाली "०१ पीक संवर्धन (२४१५ ००७२)" या उपशीर्षातर्गत "३१-सहायक अनुदाने (वेतनेतर)" या बाबीखाली रु. १२००.०० लक्ष (कृषि महाविद्यालय, कराड - रुपये ७००.०० लक्ष + कृषि महाविद्यालय, हाळगांव रुपये ५००.०० लक्ष) इतके अनुदान पुरवणी मागणीव्दारे मंजूर करण्यांत आले आहे. सदर मंजूर रक्कमेपैकी ८० टक्के च्या मर्यादेत रु.९,६०,००,०००/- {(रुपये नऊ कोटी साठ लाख) (कृषि महाविद्यालय, कराड - रुपये ५६०.०० लक्ष + कृषि महाविद्यालय, हाळगांव रुपये ४००.०० लक्ष)} इतके अनुदान वितरीत करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून मंजूरी देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१) पुरवणी मागणीव्दारे मंजूर करण्यांत आलेला निधी संदर्भ क्रमांक - १ च्या पत्रान्वये विनंती केल्यानुसार मंजूर करण्यात आलेला असल्याने सदर पत्रातील कृषि महाविद्यालय कराड, जिल्हा -

सातारा व पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर कृषि महाविद्यालय, हाळगांव, ता.जामनेर, जि.अहमदनगर या दोन कृषि महाविद्यालयांसाठी प्रस्तावित करण्यात आलेल्या बाबींसाठीच निधी खर्च करावा.

२) सदर निधी खर्च करतांना महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने यापूर्वी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना व प्रचलित निकष तसेच वित्त विभागाच्या दिनांक २० एप्रिल, २०१६ व दिनांक १७ जानेवारी, २०१७ च्या परिपत्रकातील अटी व शर्तींचे व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकारपणे पालन करावे.

३) सदर निधी हा ज्या योजनांना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्याच योजनांसाठी खर्च करण्यात यावा. प्रशासकीय मान्यता नसलेल्या योजनांसाठी सदर निधी खर्च करण्यात येऊ नये.

४) विद्यापीठाने उपलेखाशिर्ष / गट / योजना आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधीत योजनेतील जी पदे / बाबी, योजनांतर्गत योजना म्हणून पुढे चालू ठेवण्यास शासनाने मान्यता दिली आहे, त्या पदांचे वेतन व भत्ते आणि अनुज्ञेय बाबींसाठीच फक्त खर्च करावा. काही पदे रिक्त असल्यामुळे अथवा अन्य बाबी / कारणांमुळे एखाद्या योजनेखाली अनुदान अखर्चित राहील्यास, सदर अनुदान पुढील महिन्यामध्ये वितरीत करण्यात येणा-या अनुदानामध्ये समायोजित करावे.

५) उपलेखाशिर्षनिहाय, गटनिहाय, योजनानिहाय व बाबनिहाय वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित / शिल्लक राहीला / राहणार असेल तर सदर अखर्चित / शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी / योजनांसाठी / बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

६) उपलेखाशिर्षनिहाय मंजूर योजनांचे व त्या अंतर्गत मंजूर असलेल्या पदांचे सुधारित आकृतीबंधानुसार व्यवस्थितरित्या गटनिहाय वर्गीकरण केले आहे किंवा कसे याची कृषि परिषदेने / विद्यापीठाने सखोल तपासणी करावी. सदर वर्गीकरणामध्ये शासनाच्या मान्यतेशिवाय कोणतेही बदल करु नयेत.

७) प्रत्येक गटामधील वितरीत केलेले सहाय्यक अनुदान आणि महसूली उत्पन्न त्या गटातील अनुज्ञेय बाबींवरील खर्च भागविण्यासाठी आणि विकास कामे करण्यासाठी उपयोगात आणावे. एका गटाचे सहायक अनुदान आणि महसूली उत्पन्न दुस-या गटातील योजनां / बाबींसाठी वर्ग करु नये. एखाद्या गटातील योजनेसाठी जास्त सहायक अनुदान वितरीत झाले असेल तर, पुढील निधीची मागणी करताना सदर जास्तीचे अनुदान विचारात घेऊन तेवढ्या कमी व अनुज्ञेय निधीची मागणी करावी.

८) शासनाने मंजूर केलेल्या पदांपैकी जी पदे महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३ आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९० मधील तरतूदीप्रमाणे भरलेली आहेत व सदर पदे योजनेतर खर्चाने पुढे चालू ठेवण्यासाठी शासनाने मान्यता दिली आहे, अशा पदांच्या वेतन व भत्त्यांसाठीच विहीत अनुदान देय राहील.

९) प्रत्येक उपलेखाशीर्ष / गट/योजना आणि बाब निहाय स्वतंत्र लेखे / हिशोब ठेवावेत.

१०) महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेने विद्यापीठास मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सुत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच विहीत आदेश / कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा मुल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किती आहे हे तात्काळ शासनास कळवावे.

११) शासनाने विद्यापीठाच्या काही नवीन योजनांना मान्यता देताना, सदर योजनेमधील पदे अंतर्गत समायोजनाने उपलब्ध करण्यास/भरण्यास मान्यता दिलेली आहे. यामुळे सदर नवीन योजनेसाठी नवीन

पदे निर्माण झाल्यामुळे, ज्या योजनेतर / योजनांतर्गत मूळ योजनांमधील पदे अंतर्गत समायोजनाने नवीन योजनेकरिता वर्ग / उपलब्ध केली असतील, त्या मूळ योजनांमधील पदांचे वेतन व भत्यासाठी या आदेशान्वये वितरीत केलेला निधी खर्च करु नये. तसेच तिमाही अनुदानाची मागणी करताना, अशा पदांचे वेतन व भत्त्यासाठी लागणा-या निधीची मागणी करु नये.

१२) कृषि विद्यापीठास त्यांचे महसूली उत्पन्न वापरण्यास शासनाने मान्यता दिलेली आहे. याबाबत विद्यापीठाने विहीत आदेश आणि कार्यपध्दतीनुसार उचित कार्यवाही करावी. तसेच महसूली उत्पन्न वाढविण्याच्या योजना राबविण्याबाबत कार्यवाही करावी.

१३) विद्यापीठास मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखा संहिता १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि **प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिका-यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.**

१४) सन २०१६-२०१७ मधील अनुदानाची मागणी करताना, विद्यापीठाने दरमहा १० तारखेपर्यंत योजनानिहाय वितरीत केलेले अनुदान, प्रत्यक्ष खर्च आणि शिल्लक अनुदान याबाबतचा अहवाल सादर करावा. यापुढे अनुदानाची मागणी सादर करताना, पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानातील शिल्लकीची प्रस्तावित मागणीशी सांगड घालून, प्रत्यक्षात आवश्यक तेवढ्याच अनुदानाची मागणी करण्यात यावी.

१५) नियमबाह्य योजना, पदे आणि बाबींसाठी खर्च करु नये.

१६) विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिका-यांनी उपरोक्त अटी व शर्तींचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

१७) उप विभागीय कृषि अधिकारी, अहमदनगर यांनी वरीलप्रमाणे "०१ पीकसंवर्धन" (२४१५ ००७२ या उपशीर्षांतर्गत पुरवणी मागणीव्दारे मंजूर करण्यात आलेले रु. ९,६०,००,०००/- (अक्षरी रुपये नऊ कोटी साठ लाख फक्त) इतके अनुदान शासन निर्णय क्रमांक कृषि व सहकार विभाग क्रमांक अेजीयु-१०७२/१८४७१/व्ही, दिनांक २७ सप्टेंबर १९७२ आणि शासन निर्णय क्रमांक कृषिवि- २००३/सीआर-३५/२०-अे, दिनांक २५/४/२००३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

१८) या प्रित्यर्थचा खर्च सन २०१६-२०१७ च्या अंदाजपत्रकात खालील लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| मंजूर अनुदान | लेखाशिर्ष |
|---|---|
| रु. ९,६०,००,०००/- | मागणी क्रमांक डी-३<br>२४१५ कृषि विषयक संशोधन व शिक्षण<br>०१ पीकसंवर्धन, १२०, इतर संस्थांना सहाय्य<br>(००) (०१) महात्मा फुले कृषि विद्यापीठाला सहाय्यक अनुदान<br>३१, सहायक अनुदान (वेतनेतर) दत्तमत (२४१५ ००७२) |

सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक २५०/१४३१, दिनांक ३०/०१/२०१७ व वित्त विभागाचा आनौपचारिक संदर्भ क्रमांक - १०३/ अर्थ-१३, दिनांक ०७/०२/२०१७ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०४१७५६३६९४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Prakash Shankar Shete

Digitally signed by Prakash Shankar Shete
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash Shankar Shete
Date: 2017.03.04 17:59:47 +05'30'

**(प्र. शं. शेटे)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. महासंचालक / सल्लागार (वित्त), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
२. कुलगुरु, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा - अहमदनगर,
३. कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा - अहमदनगर,
४. नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा - अहमदनगर,
५. उपअभियंता, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा - अहमदनगर,
६. कृषि आयुक्त, (अेजी १० सेल) महाराष्ट्र राज्य, पुणे (खर्च ताळमेळ शाखा),
७. उपविभागीय कृषि अधिकारी, अहमदनगर, जि. अहमदनगर,
८. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर,
९. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर / उपकोषागार अधिकारी, राहूरी, जिल्हा अहमदनगर,
१०.मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
११.उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
१२.जिल्हा लेखा परिक्षा अधिकारी, स्थानिक निधी लेखा, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी,
१३.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई /निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
१४.वित्त विभाग (व्यय-१ / अर्थ-१३), मंत्रालय, मंबई - ४०० ०३२,
१५.कक्ष अधिकारी, कार्यासन २अे / ६अे / ७अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
**१६.**कार्यासन ८-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.